केंद्र पुरस्कृत समग्र शिक्षा (प्राथमिक शिक्षण, माध्यमिक शिक्षण व शिक्षक शिक्षण) कार्यक्रमासाठी अनुसूचित जमाती उपयोजनेचा (TSP) सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील तिसरा हप्ता वितरीत करणेबाबत. (केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा).

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:- समग्र २०२४/प्र.क्र. ९४/ एसडी-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक: २४ फेब्रुवारी २०२५.

**वाचा :-**

१) राज्य प्रकल्प संचालक (समग्र शिक्षा), महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांचे पत्र, क्र. मप्राशिप/ सशि / ३ रा हप्ता/ Rec, Non-Rec/(SAP, GEN, SC, ST) निधी मागणी/ २०२४-२५/ ५२४, दि.२१.०२.२०२५.

२) शिक्षा मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. F. No. १०-२/ २०२४-IS-१ (ST), दि. २१.०२.२०२५.

३) आदिवासी विकास विभागाचे परिपत्रक, क्र. बीयुडी २०२४/प्र. क्र. ०२/ का-६, दि. ०१.०८.२०२४.

४) वित्त विभाग, शासन परिपत्रक, दि. ०५.१२.२०२३, दि. ०८.१२.२०२४, दि.२५.०७.२०२४ व दि.१२.०२.२०२५.

**प्रस्तावना :-**

राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी त्यांच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील पत्रान्वये समग्र शिक्षा योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०२४-२५ करीता तिसऱ्या हप्त्याचा केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा निधी वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

२. समग्र शिक्षा योजनेसाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिस्स्याचे प्रमाण (केंद्र: राज्य) ६०:४० असे आहे. केंद्र शासनाने संदर्भ क्र. २, दि. २१.०२.२०२५ रोजीच्या आदेशान्वये अनुसूचित जमाती उपयोजनेचा (TSP) केंद्र हिस्सा रु.३५,७६,१७,०००/- व सदर निधीच्या प्रमाणात राज्य हिस्स्याचा रु. २३,८४,११,३३३/- असे एकूण रु.५९,६०,२८,३३३/- इतका निधी वितरीत व खर्च करावयाचा आहे.

३. वित्त विभागाच्या दि. २५.०७.२०२४ व दि. १२.०२.२०२५ तसेच, आदिवासी विकास विभागाच्या दि.०१.०८.२०२४ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये दिलेल्या सुचनांनुसार समग्र शिक्षा योजनेंतर्गत सन २०२४-२५ या वर्षात अनुसूचित जमाती उपयोजनेचा (TSP) उपयोजनेचा केंद्र हिस्सा (६०%) २२०२ आय ६४८, ३१-सहायक अनुदाने या लेखाशिर्षाखाली रु. ३५,७६,१७,०००/- इतका निधी तसेच सदर निधीच्या समरूप राज्य हिस्सा (४०%) २२०२ आय ६५७, ३१-सहायक अनुदाने या लेखाशिर्षाखाली रु. २३,८४,११,३३३/- असे एकूण रु. ५९,६०,२८,३३३/- इतका निधी मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र शासनाने समग्र शिक्षा योजनेसाठी अनुसूचित जमाती उपयोजनेचा (TSP) या घटकाकरीता वितरीत केलेला निधी केंद्र हिस्सा "मागणी क्रमांक टी-५, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (१०) समग्र शिक्षा अभियान (केंद्र हिस्सा ६० टक्के), (२२०२ आय ६४८), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षाखाली रु. ३५,७६,१७,०००/- इतका निधी तसेच सदर निधीच्या समरूप राज्य हिस्सा "मागणी क्रमांक टी-५, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (११) समग्र शिक्षा अभियान (राज्य हिस्सा ४० टक्के) (२२०२ आय ६५७), ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली रु. २३,८४,११,३३३/- असे एकूण रु. ५९,६०,२८,३३३/- इतका निधी राज्य प्रकल्प संचालक ( समग्र शिक्षा), महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नी रोड, मुंबई यांचेकडे समग्र शिक्षा योजनेच्या अंमलबजावणीसाठी या आदेशान्वये सुपुर्द करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर अनुदान सशर्त अनुदान असुन यापुर्वी वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे. या अनुदानाच्या अटी व शर्ती सदर शासन निर्णयात नमुद केल्या आहेत.

३. समग्र शिक्षा योजनेतील सर्व खर्च हा Single Nodal Account (SNA) मधून करण्यात यावा.

४. सदर खर्च संदर्भाधिन वित्त विभागाचे दि. २५.०७.२०२४ व दि.१२.०२.२०२५ रोजीचे परिपत्रक व आदिवासी विकास विभागाचे दि.०१.०८.२०२४ रोजीच्या परिपत्रकान्वये दिलेल्या सूचनांनुसार करण्यात यावा. सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी अवर सचिव/ कक्ष अधिकारी (रोख/लेखा शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तर सह/उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी निधी कोषागारातून आहरित करुन निधी समग्र शिक्षा यांच्या बँक खात्यात जमा करावा.

५. सदर शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी केंद्र शासनाचे दि.२५.०७.२०२४ व दि. २७.०८.२०२४ रोजीच्या आदेशामध्ये दिलेल्या निदेशानुसार व सन २०२४-२५ च्या वार्षिक कार्ययोजना व अंदाजपत्रक प्रकल्प मान्यता मंडळाने (PAB) मंजूर केलेल्या समग्र शिक्षा योजनेच्या चालू योजनांच्या आवर्ती/अनावर्ती बाबीसाठी खर्च करावा. आवर्ती व अनावर्ती बाबींचा सविस्तर तपशील सोबत **परिशिष्ट "अ"** येथे जोडला आहे.

४. वित्त विभागाचे दि. २५.०७.२०२४ व दि. १२.०२.२०२५ रोजीचे परिपत्रक तसेच आदिवासी विकास विभागाचे दि. ०१.०८.२०२४ रोजीच्या परिपत्रकान्वये दिलेल्या सूचनांनुसार तसेच खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल, याची दक्षता घ्यावी.

५. जनजाती क्षेत्र उपयोजना, अनुसूचित जमाती उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

६. अनुसूचित जमाती विशेष घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतून अनुसूचित जमाती उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि अनुसूचित जमाती उपयोजना बाह्य क्षेत्रात फक्त वैयक्तीक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

७. अनुसूचित जमाती/ जनजाती क्षेत्र उपयोजना या लेखाशिर्षाखाली उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, लेखाशिर्षनिहाय /उप लेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्ट्ये इ.माहिती, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; आदिवासी विकास विभाग व शालेय शिक्षण विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावी.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे दि. २५.०७.२०२४ व दि. १२.०२.२०२५ रोजीचे परिपत्रक तसेच आदिवासी विकास विभागाचे दि.०१.०८.२०२४ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये दिलेल्या सुचनांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२२४११५२३३७६२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2025.02.24 11:54:04 +05'30'

**(तुषार महाजन)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मंत्री (शालेय शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
८. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
९. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर.
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर.
११. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई-६३.
१२. सर्व वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग).
१३. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई

१४. सह सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई

१५. वित्त विभाग, (व्यय-५/अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई

१६. अवर सचिव/कक्ष अधिकारी, लेखाशाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई

१७. अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय , मुंबई.

१८. निवड नस्ती (एसडी-१).

**शासन निर्णय, क्रमांक समग्र २०२४/प्र.क्र. ९४/एसडी-१, दि. २४.०२.२०२५ सोबतचे "परिशिष्ट-अ"**

केंद्र पुरस्कृत समग्र शिक्षा (प्राथमिक शिक्षण, माध्यमिक शिक्षण व शिक्षक शिक्षण) उपयोजनेचा अनुसूचित जमाती (TSP) घटकातील तिसऱ्या हप्त्याचा केंद्र हिस्सा व राज्य हिस्साकरीता वितरीत करावयाच्या निधीचे आवर्ती व अनावर्ती बाबींनुसार तपशील:-

| अ. क्र. | केंद्र शासन आदेश दिनांक | बाब | आवर्ती | | अनावर्ती | | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | केंद्र | राज्य | केंद्र | राज्य | |
| १ | ०४.१२.२०२४ | प्राथमिक शिक्षण (अ) | ३१,४०,५४,००० | २०,९३,६९,३३३ | १,२१,१६,००० | ८०,७७,३३३ | ५४,३६,१६,६६६ |
| २ | २७.०८.२००४ | माध्यमिक शिक्षण (ब) | २,४७,४७,००० | १,६४,९८,००० | ० | ० | ४,१२,४५,००० |
| ३ | २५.०७.२०२४ | शिक्षक शिक्षण (क) | ६७,००,००० | ४४,६६,६६७ | ० | ० | १,११,६६,६६७ |
| **एकूण (अ+ब+क)** | | | **३४,५५,०१,०००** | **२३,०३,३४,०००** | **१,२१,१६,०००** | **८०,७७,३३३** | **५९,६०,२८,३३३** |

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2025.02.24 11:54:29 +05'30'

(तुषार महाजन)
उप सचिव, महाराष्ट्र शासन